**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा-२०१७ च्या निकाला आधारे सरळसेवेने निवड झालेल्या मुख्याधिकारी गट - अ व गट- ब संवर्गातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधी करिता अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन,**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.एमसीओ-२०१९/प्र.क्र.१९८/नवि-१४,**
मंत्रालय, मुख्य इमारत (४ था मजला),
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मुंबई ४०० ०३२.
**दिनांक ०४ नोव्हेंबर, २०१९**

संदर्भ:- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.टीआरएन-०७१८/प्र.क्र.३७/सिपीटीपी, दि.१३.०८.२०१८.
२. सामान्य प्रशासन विभागाचे शासन पत्र, क्र. टीआरएन-०७१८/प्र.क्र.३०७/सिपीटीपी,.१७.०९.२०१९.
२. सामान्य प्रशासन विभागाचे शासन पत्र, क्र. टीआरएन-०७१९/प्र.क्र.५२/सिपीटीपी, दि.१८.०९.२०१९.
२. समक्रमाकांचे दि.३०.०९.२०१९ चे पत्र.

**प्रस्तावना: -**

संदर्भ क्र.१ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयानुसार, महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षा-२०१७ च्या अंतिम निकालाव्दारे तसेच यापुढील परीक्षांव्दारे नगरपालिका/ नगरपरिषद, मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब या संवर्गासाठी निवड झालेल्या उमेदवारांना एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमातून (CPTP) वगळले आहे. त्यामुळे, संबंधित उमेदवारांना नियुक्ती देणे, त्यांचे प्रशिक्षण आयोजित करणे व इतर अनुषंगिक बाबींसंदर्भात संबंधित प्रशासकीय विभाग म्हणून या विभागामार्फत कार्यवाही करण्यात येत आहे.

तद्नुषंगाने, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ व ३ च्या पत्रान्वये राज्यसेवा परीक्षा-२०१७ मधून महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत मुख्याधिकारी गट-अ व गट-ब संवर्गामधील शिफारस प्राप्त उमेदवारांचा तपशील उपलब्ध झाला. संदर्भ क्र.४ अन्वये संबंधित उमेदवारांसाठी दि.०३.१०.२०१९ पासून अनिवार्य पायाभूत प्रशिक्षण कार्यक्रम सुरु करण्यात आला आहे. सदर प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन उमेदवारांसाठी प्रशिक्षण कार्यक्रमास रुजु झालेल्या उमेदवारांइतकी म्हणजे ९९ अधिसंख्य पद निर्माण करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यसेवा (मुख्य)परीक्षा-२०१७ अंतिम निकालाच्या आधारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने मुख्याधिकारी, गट-अ संवर्गातील पदांकरीता निवड केलेल्या ६ शिफारसप्राप्त उमेदवारांसाठी रु.S-२० रु.५६१००-१७७५०० (६ व्या वेतन आयोगानुसार रु.१५६००-३९१००, ग्रेड पे-५४००) या वेतनश्रेणीत दि.०३.१०.२०१९ पासून पासून २ वर्षाच्या कालावधीसाठी ६ अधिसंख्य निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. मुख्याधिकारी, गट-ब संवर्गातील पदांकरीता निवड केलेल्या ९३ शिफारसप्राप्त उमेदवारांपैकी दि.०३.१०.२०१९ रोजी रुजू झालेल्या ८८ उमेदवारांसाठी दि.०३.१०.२०१९ पासून तसेच, खालील ५ उमेदवारांच्या प्रत्यक्ष रुजू दिनांकापासून २ वर्षांच्या कालावधीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे: -

| **अ.क्र.** | **उमेदवाराचे नाव** | **प्रशिक्षणासाठी रुजू झाल्याचा अधिसंख्य पदे निर्मितीचा दिनांक** |
|---|---|---|
| १. | श्री.ढोकले हनुमंत आबासाहेब | ०५.१०.२०१९ |
| २. | श्री.कोडगुले पराग संजीव | ०९.१०.२०१९ |
| ३. | श्री.माळी संतोष लक्ष्मण | १०.१०.२०१९ |
| ४. | श्रीमती कराळे कोमल पांडुरंगजी | १२.१०.२०१९ |
| ५. | श्री.बच्छाव सचिन काशिनाथ | १४.१०.२०१९ |

३. मुख्याधिकारी, गट-ब संवर्गातील पदांकरीता निवड केलेल्या ९३ शिफारसप्राप्त उमेदवारांकरीता उपरोक्तप्रमाणे २ वर्षांच्या कालावधीसाठी रु.S-१५ रु.४१८००-१३२३०० (६ व्या वेतन आयोगानुसार रु.९३००-३४८००, ग्रेड पे-४४००) या वेतनश्रेणीत अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर एकुण ९९ अधिसंख्य पद आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहे.

५. मुख्याधिकारी गट-अ व गट-ब संवर्गातील सदर ९९ अधिसंख्य पदाच्या वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या “मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशिर्ष २२१७, नगर विकास विभाग, ८० सर्वसाधारण, ००१ संचालन व प्रशासन (००) (०१) संचालक, नगर परिषद प्रशासन (२२१७००४७) संचालक नगरपरिषद प्रशासन

(२२१७००४७)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तिय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११०४१६०२५९६९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sachin Dattatray Sahasrabuddhe

Digitally signed by Sachin Dattatray Sahasrabuddhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7db996f7c088dbf2d76ad85484362957aab596e46ec268eca3b9822aa62fd32b, serialNumber=67648ad8c40ecf8d0f911eaf72d918202f02f540836a5f65e8b71c0a69d61291, cn=Sachin Dattatray Sahasrabuddhe
Date: 2019.11.04 16:07:47 +05'30'

**(सचिन सहस्त्रबुध्दे)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत:-**

१. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
३. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक.
४. सर्व जिल्हाधिकारी.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. महालेखापाल १/२ (ले. व अ.)/(ले.प.), मुंबई/ नागपूर.
७. उप सचिव, सीपीटीपी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (वित्तिय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (नवि-१४).